**केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री कृषी सिंचन योजना - पाणलोट विकास घटक २.० या योजनेंतर्गत सर्वसाधारण घटक अंतर्गत निधीचे वितरण करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**मृद व जलसंधारण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : केंपुयो-२०२३/प्र.क्र.१४/जल-८**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०००३२
दिनांक : ३१ मार्च, २०२४

वाचा :

१. शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.०८.१२.२०२३,
२. केंद्रीय ग्रामीण विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र. के-११०११/१३/२०२२ WDC २.०/ Maharashtra दि.२७.०३.२०२४,
३. शासन निर्णय, मृद व जलसंधारण विभाग क्र.केंपुयो-२०२३/प्र.क्र.१४/जल-८, दि.२७.०९.२०२३, दि.०२.११.२०२३ व दि.१०.०१.२०२४.

**प्रस्तावना :**

केंद्रिय भूसंसाधन विभाग, ग्रामीण विकास मंत्रालय, भारत सरकार यांचेमार्फत केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री कृषी सिंचन योजना - पाणलोट विकास घटक २.० या प्रकल्पाकरिता सामाईक मार्गदर्शक सूचना २०२१ निर्गमित करण्यात आलेल्या आहेत. त्यानुसार राज्यात प्रधानमंत्री कृषी सिंचन योजना-पाणलोट विकास घटक २.० ही योजना राबविण्यास दि.२७.०४.२०२२ च्या शासन निर्णयान्वये मान्यता प्रदान करण्यात आली आहे. सदर योजनेच्या केंद्र व राज्य हिस्स्याचे प्रमाण ६०:४० असून केंद्र शासनाच्या संदर्भाधीन क्र.२ च्या पत्रान्वये केंद्र शासनाने **सर्वसाधारण घटक अंतर्गत** केंद्र हिस्सा रु.५६४९.०० लाख इतका निधी उपलब्ध करुन दिला आहे. सबब, सदर केंद्र हिस्सा निधी व त्यास समरुप ४०% राज्य हिस्सा निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री कृषी सिंचन योजना - पाणलोट विकास घटक २.० या योजनेची अंमलबजावणी करण्याकरिता **सर्वसाधारण घटक अंतर्गत** केंद्र हिस्सा ६० टक्के (लेखाशीर्ष ४४०२२७४३) अंतर्गत रु.५६,४९,००,०००/- (रुपये छपन्न कोटी एकोणपन्नास लाख फक्त) व राज्य हिस्सा ४० टक्के (लेखाशीर्ष ४४०२२७५२) अंतर्गत रु.३७,६६,००,०००/- (रुपये सदतीस कोटी सहासष्ट लाख फक्त) इतका निधी असा मिळून रु.९४,१५,००,०००/- (रुपये चौऱ्यान्नव कोटी पंधरा लाख फक्त) इतका निधी वितरित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर निधी खर्च करण्यासाठी उप आयुक्त (वित्त), आयुक्त, मृद व जलसंधारण यांचे कार्यालय, छत्रपती संभाजीनगर यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून, तर मुख्य कार्यकारी अधिकारी, वसुंधरा पाणलोट विकास यंत्रणा यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. वरील निधीचा विनियोग करतांना केंद्र सरकारच्या वित्त मंत्रालयाने, तसेच ग्रामीण विकास मंत्रालय यांनी वेळोवेळी निर्गमित केलेल्या कार्यपध्दती, मार्गदर्शक सूचना व अटी-शर्तीचे अनुपालन

करण्याची दक्षता घेण्यात यावी. तसेच, लोकसभा सार्वत्रिक निवडणूक, २०२४ च्या अनुषंगाने लागू असलेल्या आदर्श आचारसंहितेचा भंग होणार नाही, याची दक्षता घ्यावी.

४. सदरचा खर्च पुढील लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतुदीमधून भागविण्यात यावा.

---

<u>मागणी क्र.ZH-५</u>
४४०२ - मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च
(००),
(१०२) मृद संधारण
(०१) पाणलोट क्षेत्र विकास कार्यक्रम
(०१)(०४) प्रधानमंत्री कृषि सिंचन योजना - एकात्मिक पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन कार्यक्रम (सर्वसाधारण) (केंद्र हिस्सा ६० टक्के) (कार्यक्रम)
५३, मोठी बांधकामे (४४०२२७४३)

<u>मागणी क्र.ZH-५</u>
४४०२ - मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च
(००),
(१०२) मृद संधारण
(०१) पाणलोट क्षेत्र विकास कार्यक्रम
(०१)(०५) प्रधानमंत्री कृषि सिंचन योजना - एकात्मिक पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन कार्यक्रम (सर्वसाधारण) (राज्य हिस्सा ४० टक्के) (कार्यक्रम)
५३, मोठी बांधकामे (४४०२२७५२)

५. मुख्य कार्यकारी अधिकारी, वसुंधरा पाणलोट विकास यंत्रणा, पुणे यांनी वरील खर्चाची उपयोगिता प्रमाणपत्रे आवश्यक त्या माहितीसह केंद्र व राज्य शासनाकडे निर्धारित कालावधीमध्ये सादर करावीत.

६. सदर शासन निर्णय वित्त विभाग, शासन परिपत्रक, क्र. अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.०८.१२.२०२३ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३३१११५३५७५१२६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAVI SHIVAJI VHATKAR

Digitally signed by RAVI SHIVAJI VHATKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=SOIL AND WATER CONSERVATION DEPARTMENT, 2.5.4.20=bca9a9d38f4447074d53ffd7129d6c978023dfe76311c98a4ffd7de9447d9bb9, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=85AD116139ECB1182DD7FBEF85E39485778BB2D61F5A53C998FFD46129875C23, cn=RAVI SHIVAJI VHATKAR
Date: 2024.03.31 12:51:25 +05'30'

**( र. शि. व्हटकर )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव.

२) मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव,

३) मा. उपमुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव,

४) सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव,

५) मा. मुख्य सचिव यांचे सह सचिव,

६) आयुक्त, मृद व जलसंधारण, महाराष्ट्र राज्य, छत्रपती संभाजीनगर,

७) मुख्य कार्यकारी अधिकारी, वसुंधरा पाणलोट विकास यंत्रणा, पुणे.

८) सर्व विभागीय आयुक्त,

९) महासंचालक, जल व भूमी व्यवस्थापन संस्था (वाल्मी), छत्रपती संभाजीनगर,

१०) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई (प्रसिद्धी करीता),

११) संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे,

१२) संचालक, मृदसंधारण व पाणलोट क्षेत्र व्यवस्थापन, महाराष्ट्र राज्य, पुणे,

१३) संचालक, अर्थ व सांख्यिकी संचालनालय, मुंबई,

१४) संचालक, महाराष्ट्र सुदूर संवेदन केंद्र, नागपूर,

१५) सर्व जिल्हाधिकारी,

१६) सर्व उपजिल्हाधिकारी (रोहयो),

१७) सर्व उपायुक्त (विकास),

१८) अपर मुख्य कार्यकारी, वसुंधरा पाणलोट विकास यंत्रणा, पुणे,

१९) अपर आयुक्त (जलसंधारण), मृद व जलसंधारण विभाग, पुणे,नागपूर /

२०) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,

२१) सर्व प्रादेशिक जलसंधारण अधिकारी,

२२) सर्व जिल्हा जलसंधारण अधिकारी,

२३) महालेखापाल -१/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर. (लेखा परीक्षा / लेखा व अनुज्ञेयता)

२४) वरिष्ठ कोषागार अधिकारी, पुणे / छत्रपती संभाजीनगर,

२५) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,

२६) वित्त विभाग (व्यय-१५, अर्थ-१७), मंत्रालय, मुंबई,

२७) मृद व जलसंधारण विभाग/जल-११, मंत्रालय, मुंबई

२८) जल-८ (निवडनस्ती)